

जय गजानन ५५

भगवान श्रीएकदंतांची दिव्यगाथा राजर्षी प्रल्हादास सांगतांना महर्षी गृत्समद म्हणतात- मदासुर शांत झाला. त्याद्वारे अतीव प्रसन्न झालेल्या श्रीहरी इत्यादी देवता भगवान श्रीएकदंतांच्या समीप गेल्या. भृगू इत्यादी महर्षी सुद्धा श्रीचरणी पोहोचले. सगळ्यांनी दण्डवत घातला आणि त्या देवतांनी, महर्षींनी हर्षसंयुक्तरीतीने स्तोत्र गायनास आरंभ केला-

'हे सदात्मरूपा, सकलादिभूता, अमायिका, अचिन्त्या, अबोधा, आदिमध्यान्तहीना एकदंता आम्ही तुम्हास शरण आहोत. अनंत, चिद्रुपमया, गणेश भेदाभेदविहीना, आद्यरूपा, हृदयस्था एकदंता तुला नमन असो. हे समाधीसंस्था, हे योगिहृदय निवासी, हे निरालंबा, समाधिगम्या तुज वंदन असो.' आपल्या बिंबभावाने तू या समस्त जगताची निर्मिती करतोस. त्या मायेत आपले वीर्य तू स्थापित करतोस. अचेतन अशा त्या मायेला चैतन्य प्रदान करतोस. त्या मायेने त्या वीर्याच्या आधारे हे जगत् साकार केलेले असते. त्या गुणेश्वर, गुणबोधिता अशा एकदंतास आम्ही शरण जातो.

भगवान गणनाथाच्या या चैतन्यदानाने सर्वप्रथम माया तुरीया अवस्थेतील जगताची निर्मिती घडविते. या अवस्थेला शास्त्रकार 'आत्मकवित्ती' म्हणतात. अर्थात 'आत्मरूपातच ज्याची जाणीव होते' अशी ही सृष्टी असते.

त्यानंतर नाद प्रेरित होऊन ती माया तुझ्याच शक्तीने सुषुप्ती संज्ञक विश्वाची निर्मिती करते. त्याला समानभूत अथवा एकभूत सृष्टी असे म्हणतात. अर्थात या अवस्थेत सगळी भूते म्हणजे प्राणिमात्रे समान अवस्थेत असतात. अर्थात उंच, बुटका, गोरा, काळा, श्रीमंत, गरीब, स्त्री पुरुष, तरूण वृद्ध इत्यादी समस्त भेद सुषुप्तीत, गाढ निद्रेत लोप पावत असल्याने या सृष्टीला समानभूत सृष्टी म्हणतात. या सगळ्या निर्मिती तुझी मायासहित मूर्ती श्रीगुणेश्वर करीत असतो. त्या गुणेश रूपात नटणाऱ्या एकदंता तुला नमन असो.

तमोगुणाच्या द्वारे तेच विश्व अर्थात सुषुप्तीगत विश्व दोन प्रकारात विभक्त होत असते. अनेकभूत तथा एकभूत अर्थात प्रत्येकाची वेगळी सुषुप्ती रूपात, व्यष्टी रूपात अनेक तर समस्त ब्रह्मांडाची एक सुषुप्तीरूपात एकभूत अशा दोन सृष्टी तयार होत असतात. त्या एकदंतास आम्ही शरण जातो.

त्यानंतर तो गुणेश्वर तुझ्याच कृपाबलाने सूक्ष्मभावाचे जगत निर्माण करतो. त्यालाच स्वप्नजगत असेही म्हणतात. तेही तुझ्या कृपेने एक तथा अनेक अशा दोन प्रकारचे असते. त्यानंतर जागृत विश्व निर्माण केले जाते. जे जागृतविश्व रजोगुणाच्या द्वारे अनेक रूपात नटलेले असते. ही सगळी ज्याची लीला आहे त्या श्रीएकदंतास आम्ही शरण जातो.

प्रकृतीरूपाने तूच जग निर्माण करतोस. त्यात तूच विलास करीत असतो. बुद्धिदाता रूपात तूच या विश्वाची लीला उपभोगतोस. अशा एकदंतास आम्ही शरण जातो. ज्याच्या आज्ञेने आकाशात ग्रह तारे नक्षत्र राशीसमूह प्रकाशत असतात, आपल्या मार्गावर भ्रमण करतात. त्या एकदंतास शरण जातो. तुझ्या आज्ञेनेच विधाता विश्वाची निर्मिती करतो. तुझ्या सत्तेनेच श्रीविष्णू त्याचे पालन करतो. तुझ्या आदेशानेच कैलासनाथ या जगताचा विलय करतात. त्या एकदंतांस आम्ही शरण जातो. ज्याच्या सत्तेने ही पृथ्वी जलात सुस्थापित झालेली असते. ज्याच्या आज्ञेने नद्या वाहतात. सागर आपली सीमा ओलांडत नाही. देवगण अमर झाले. स्वर्गात नरांना स्वकर्माची फले मिळतात. ज्याच्या आज्ञेने पर्वत स्थिर असतात. शेष पृथ्वीला मस्तकी धारण करतो. कामदेव ज्याच्या आज्ञेने जगताला मोहावस्थेत अडकवतात त्या एकदंताला आम्ही शरण जातो. ज्याच्या आज्ञेने अर्यमा म्हणजे सूर्य 'काल' नियंत्रित करतो. त्याच्याच आज्ञेने वारा वाहत असतो. वायू जठरात आश्रय करतो. त्या एकदंतास आम्ही शरण जातो. चराचर सृष्टी ज्यांच्या आज्ञेत असते. अन्तरिक्ष तथा अन्यही ज्याच्याच सत्तेने कार्यरत असते त्या एकदंतास आम्ही शरण जातो.

अनंतरूपाने हृदयात निवास करणाऱ्या, योग्यांनी योगबले प्राप्त केलेल्या, देवता, नर कोणीही स्तवन करण्यास असमर्थ असणाऱ्या त्या अनादिअनंत परब्रह्मरूप एकदंतास आम्ही शरण जातो.' अशा रूपात स्तुती करून त्या देवता, ईश्वर, महेश्वर, ऋषीमुनी महंतांनी नृत्य करण्यास आरंभ केला. ज्याद्वारे भगवान श्रीएकदंत प्रसन्न झाले. भक्तवत्सल भगवान त्या

महाभागांप्रत म्हणाले, 'या स्तोत्राद्वारे आम्ही आनंदित झालो आहोत. हे स्तोत्र माझे प्रीतीकर होईल. या स्तोत्र प्रभावाने जे हवे ते प्राप्त होऊ शकेल. पुत्र, पौत्र इत्यादी सर्व लाभेल. धनधान्य गज अश्व राज्यभोग युक्ती, भुक्ती, मुक्ती, योग समस्त बाबी आम्ही प्रदान करू. मारण, उच्चाटन इ. नष्ट होतील. कारावासातून मुक्ती लाभेल.

या एकवीस श्लोकांचे एकवीसवेळा एकवीस दिवस पठन केल्याने तथा माझे मनन केल्याने काय वाट्टेल ते असंभवाती असंभव देखील माझ्या कृपेने सहज साध्य होईल. त्यास त्रैलोक्याची सुखे प्राप्त होतील. त्याच्या दर्शने देवताही पुनीत होतील.'

अशा रूपात भगवान श्रीएकदंतांची अमृतवाणी ऐकली आणि ते अमर तथा मुनी आनंदित झाले. भगवंतास प्रणामपूर्वक म्हणाले, आपली ही वाणी ऐकली. आमची कर्णपुटे धन्य झाली. भगवन्ता, आमच्या हृदयात तुझ्या भक्तीचे अटल स्थान असू दे. मायाहीनत्वाचे वरदान द्यावेस. देवतांनी प्रार्थना केली. प्रतिक्रियारूपात अन्तराळात 'तथाऽस्तु!' असा आशीर्वाद ध्वनी घुमला आणि भगवान श्रीएकदंत आपल्या स्वानंदनाथ रूपात विलीन झाले. अन्तर्धान पावले. समस्त देवता आपापल्या लोकात गेल्या. ऋषिमुनी आश्रमात परतले. देवतांना स्वर्गीय उपभोग मिळू लागले. आश्रमातून पुनश्च वेदमंत्रांचा घोष सुरू झाला. यज्ञ, याग, होम, हवन, तर्पण इ. क्रिया यथासांग घडू लागल्या.

महर्षी गृत्समद प्रल्हादास म्हणतात- हे दैत्यनायका, असे हे मदासुर शमनकारी एकदंत चरित्र मी तुला वर्णिले. दुष्टांच्या संगतीने तू ज्ञानापासून वंचित झालास. त्या गणनाथांना विसरलास. ब्रह्मदेवादिकांची अवमानना केलीस. अतः तुला विविध दुःखे प्राप्त झाली. आता त्यातून सुटण्यासाठी त्या विघ्नविनायकास श्रीएकदंतास शरण जा.

याच भगवान श्रीएकदंतानी नानाविध अवतार घेऊन अनेकवार भक्त रक्षणाचे, दुष्ट निर्दालनाचे कार्य केले आहे. श्रीकश्यपांच्या घरी विनायक अवतार धारण करून देवांतक नरांतक राक्षसांचा नाश केला आहे. भगवान श्रीशंकरांच्या घरी पुष्टिपती नामक अवतार धारण करून दुर्मती नामक दैत्याचे हनन केले आहे. कपिल पुत्र रूपात गणासुराच्या आतंकाला आळा घातला आहे. त्या एकदंतालाच तू आता शरण जा! त्यांच्या सगळ्याच कथा सर्वार्थाने कथन करण्यास कोणीही समर्थ नाही. ब्रह्मदेवादिकही त्याला वर्णू शकत नाहीत. अतः स्वचित्तात त्या चिंतामणीचे ध्यान कर. तोच एकमेव उपाय आहे. हे दैत्येश्वरा, त्या आधारे तू समस्त ज्ञान प्राप्त करशील. सुखशांती समाधानाचा अधिकारी होशील.

अशा रूपात श्रीगृत्समदांनी प्रल्हादाला सांगितलेले एकदंत चरित्र श्रीमुद्‌गलाचार्यांनी श्रीदक्ष प्रजापतीला सांगितले, असे शौनकादिक महर्षींना सांगत श्रीसूत 'त्या भगवान श्रीएकदंताच्या कृपेने सर्व मनोरथे पूर्ण होतील' म्हणत थोडे थांबले.

***